**राज्य क्रीडा विकास निधीस अंशदान**
**निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निविप्र २०१८ /प्र.क्र.१६३ /क्रीयुसे -३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : ०१ ऑगस्ट, २०१८.

**वाचा:-**

१) शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्र.राक्रीधो २००२/ प्र.क्र.९३/ क्रीयुसे-१ दि. ३ सप्टेंबर, २००३.
२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३,दि.२ एप्रिल,२०१८.
३) क्रीडा व युवक सेवा पुणे यांचे पत्र क्रमांक.राक्रीविनी/निधी वितरण प्रस्ताव/ २०१८-१९/ का-६/ २२३२ दि. २० जून, २०१८.

**प्रस्तावना: -**

शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्र.राक्रीधो २००२/प्र.क्र.९३/क्रीयुसे-१ दि. ३ सप्टेंबर, २००३ अन्वये महाराष्ट्र राज्यात क्रीडा संस्कृतीची जोपासना व संवर्धन परिणामकारक करण्याच्या दृष्टीने राज्यात क्रीडा सुविधा विकसीत करणे, राज्यातील दर्जेदार खेळाडूंना परदेशी क्रीडा मार्गदर्शकांची सेवा उपलब्ध करुन देणे व राज्यातील आंतरराष्ट्रीय खेळाडूंना आर्थिक सहाय्य करणे, प्रशिक्षणासाठी आर्थिक सहाय्य करणे तसेच क्रीडा विषयक उपक्रम परिणामकारक राबविणे या करिता सदर राज्य क्रीडा विकास निधी ही योजना संचालनालय स्तरावर कार्यान्वित आहे. सदर योजनेअंतर्गत सन २०१७--१८ साठी रु.५०.०० लक्ष अर्थसंकल्पित निधी खर्ची पडला आहे. प्रस्तुत योजनेच्या अनुषंगाने सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.५०.०० लक्ष इतक्या तरतुदीपैकी वित्त विभागाच्या दि. २/४/२०१८ च्या शासन निर्णयानुसार ७० % च्या मर्यादेत रु.३५.०० लक्ष इतक्या निधीच्या वितरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ या वर्षाकरीता महाराष्ट्र राज्यात क्रीडा संस्कृतीची जोपासना व संवर्धन परिणामकारक करण्याच्या दृष्टीने राज्यातील आंतरराष्ट्रीय खेळाडूंना आर्थिक सहाय्य करणेसाठी रु. ५०.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी रु.३५.०० लक्ष (अक्षरी रुपये पस्तीस लक्ष फक्त) तरतूद वितरीत करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्रमांक : ई-३, २२०४ क्रीडा व युवक सेवा-१०४, (३५)(०१) राज्य क्रीडा निधीला अंशदान (२२०४ २०८२), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि.२/४/२०१८ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

३.१ . वित्त विभागाच्या दि.२/४/२०१८ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

३.२. यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

३.३. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २/४/२०१८ च्या परिपत्रकातील सूचनानूसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०२१५३०५५२४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.08.02 15:33:20 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा) यांचे खाजगी सचिव
२. मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. वरीष्ठ कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे.
७. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
८. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
९. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (संचालनालयामार्फत)
१०. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत)
११. निवडनस्ती, क्रीयुसे-३.